**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील श्रीमती तेजस्विनी हिंमतराव देशमुख, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना-२०१३/प्र.क्र.०७/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०७ जानेवारी, २०१७.

वाचा :-

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.

२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-४५९९/प्र.क्र.९०७/पापु-१५, दिनांक १५ डिसेंबर, २०००.

३) **संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांकः** आस्था १/प्रक्र १८६/परीविक्षा कालावधी/तेजस्विनी देशमुख/कभू/७४३/२०१६, दिनांक २९/०९/२०१६.

प्रस्तावना :-

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील “कनिष्ठ भूवैज्ञानिक” या पदावर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये दोन वर्षांच्या परीविक्षा कालावधीकरीता अधिकाऱ्यांच्या नियुक्त्या करण्यात आल्या आहेत. या नियुक्त्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार “कनिष्ठ भूवैज्ञानिक” या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आलेल्या आहेत.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून, कनिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण केलेला असल्याने या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करून त्यांना नियमित “कनिष्ठ भूवैज्ञानिक” म्हणून स्थानापन्न नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, श्रीमती तेजस्विनी हिंमतराव देशमुख, कनिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी विभागीय परीक्षा वगळता त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या अन्य बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून (विभागीय परीक्षेच्या उत्तीर्ण दिनांकापासून) त्यांचा परीविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास व त्यांच्या वेतनवाढी मुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | परिविक्षाधीन कनिष्ठ भूवैज्ञानिकाचे नाव | रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत वाढल्याची कारणे | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | क.भू. पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्रीमती तेजस्विनी हिंमतराव देशमुख | ११/०१/२००१ | विहित मुदतीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यामुळे | १०/११/२००८ | ११/११/२००८ |

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना कळविण्यात येते की, उक्त कनिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201701071744017728 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.01.07 17:51:33 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.

३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.

४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर.

५. महालेखापाल, लेखापरीक्षा- १, महाराष्ट्र, मुंबई.

६. महालेखापाल, लेखापरीक्षा- २, महाराष्ट्र, नागपूर.

७. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)

८. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)

९. श्रीमती तेजस्विनी हिंमतराव देशमुख, कनिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा. (संचालनालयामार्फत)

१०. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५).